विभागीय कार्यालय, सांस्कृतिक कार्य संचालनालय, पुणे या कार्यालयातील "अधिक्षक" या पदावरील प्रतिनियुक्तीस अंतिम मुदतवाढ देण्याबाबत.
श्रीमती संयोगिता विजय पाटील,
सहायक कक्ष अधिकारी.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः प्रतिनि-१४१६/प्र.क्र.४०/१४-अ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: २५ फेब्रुवारी, २०२०

वाचा : १) समक्रमांचे दिनांक १७-०२-२०१६ चे आदेश.
२) सांस्कृतिक कार्य संचालनालय, विभागीय कार्यालय, पुणे यांचे क्रमांक: सांस्कृ/आरआर/२२७/१९, दिनांक ११-१२-२०१९ चे पत्र.
३) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग नस्ती क्र.सांकास-१११५ (१४)/प्र.क्र.२५१/सां.का.४,

## शासन आदेश

संदर्भाधिन क्र. १ येथील आदेशान्वये श्रीमती सं.वि.पाटील, सहायक कक्ष अधिकारी यांची सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांच्या अधिनस्त असलेले, सांस्कृतिक कार्य संचालनालय, विभागीय कार्यालय, पुणे या कार्यालयात "अधिक्षक" या पदावर **चार वर्षाच्या कालावधीसाठी प्रतिनियुक्तीने** नियुक्ती करण्यात आली होती. श्रीमती पाटील, ह्या सदरहू कार्यालयात दिनांक ०१-०३-२०१६ पासून कार्यरत असून त्यांचा ४ वर्षाचा प्रतिनियुक्ती कालावधी दिनांक २९-०२-२०२० रोजी समाप्त होत आहे.

२. सांस्कृतिक कार्य संचालनालय, विभागीय कार्यालय, पुणे यांनी संदर्भाधिन क्र. २ येथील दिनांक ११-१२-२०१९ च्या पत्रान्वये श्रीमती पाटील यांचा ४ वर्षाचा प्रतिनियुक्ती कालावधी दिनांक २९-०२-२०२० रोजी समाप्त होत असून श्रीमती पाटील, अधिक्षक यांच्याकडे पुणे विभागातील वृध्द कलाकार मानधन योजनेची अंमलबजावणी, सांस्कृतिक क्षेत्रातील संस्थाना अनुदान, विविध सांस्कृतिक कार्यक्रम व नाट्यस्पर्धाचे आयोजन इ. कामाची महत्वपूर्ण जबाबदारी सोपविण्यात आली आहे. त्यांच्यावर सोपविण्यात आलेली जबाबदारी लक्षात घेता व त्यांची कौटुंबिक अडचण लक्षात घेता श्रीमती पाटील यांच्या प्रतिनियुक्तीस पुढील १ वर्ष मुदतवाढ देण्याची विनंती केली आहे. पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागाने संदर्भाधिन क्र. ३ येथील प्रस्तावान्वये पुणे येथील सदर कार्यालयात कायमस्वरुपी अधिकारी/कर्मचारी यांची नियुक्ती होईपर्यंत सदर पदे प्रतिनियुक्तीने भरणे गरजेचे आहे. पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागाने श्रीमती पाटील यांच्या प्रतिनियुक्तीस ५ व्या वर्षी दिनांक ०१-०३-२०२० पासून पुढील एक वर्षासाठी प्रतिनियुक्तीस मुदतवाढ देण्याची शिफारस केली आहे.

३. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : एसआरव्ही २०११/प्र.क्र.१३७/का.१२, दिनांक १७.१२.२०१६ अन्वये प्रतिनियुक्तीचे धोरण निश्चित करण्यात आले असून, या शासन निर्णयास शा.नि. क्र.एसआरव्ही-२०१६/प्र.क्र.५१०/कार्या-१२, दिनांक १६-०२-२०१८ अन्वये दि.१७-१२-२०१६ च्या शासन निर्णयातील परि.५ मध्ये पुढीलप्रमाणे सुधारणा करण्यात आली आहे:-

परि.क्र. ५(अ) (३) :- प्रतिनियुक्ती प्रथमत: ३ वर्षासाठी देण्यात यावी व संबंधित अधिकाऱ्याची इच्छुकता व संवर्ग नियंत्रण विभागाचे सहमतीने हा कालावधी चौथ्या वर्षाकरिता वाढविण्यात यावा. परंतु चार वर्षांचा

प्रतिनियुक्तीचा कालावधी पूर्ण झाल्यानंतर आणखी एक वर्षासाठी म्हणजेच ५ व्या वर्षासाठी मुदतवाढ द्यावयाची झाल्यास मा. मुख्यमंत्री यांची विनिर्दिष्टपणे मान्यता घेण्यात यावी. ५ वर्षाचा कालावधी संपल्यानंतर कोणत्याही परिस्थितीत मुदतवाढ अनुज्ञेय राहणार नाही.

४. उपरोक्त परि.३ मधील शासन निर्णयातील तरतुदीस अनुसरुन ५ व्या वर्षी श्रीमती संयोगिता वि.पाटील, सहायक कक्ष अधिकारी, सांस्कृतिक कार्य संचालनालय, विभागीय कार्यालय, पुणे यांच्या प्रतिनियुक्तीस ( दिनांक ०१-०३-२०२० ते दिनांक २८-०२-२०२१ पर्यंत) फक्त एक वर्ष अंतिम मुदतवाढ देण्यात येत आहे.

५. प्रतिनियुक्ती संदर्भात सर्व अटी व शर्ती या विभागाचे आदेश क्र.एएससी १४१६/प्र.क्र.१०/१४-अ, दिनांक १७-०२-२०१६ मध्ये नमूद केल्याप्रमाणे असतील. श्रीमती सं.वि.पाटील, सहायक कक्ष अधिकारी यांच्या प्रतिनियुक्तीस मुदतवाढ अंतिम स्वरुपाची असून त्यांना या पुढे कोणतीही मुदतवाढ देण्यात येणार नाही. तसेच त्यांना मुदतवाढ देण्याबाबतचा प्रस्ताव पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागाने तसेच सांस्कृतिक कार्य संचालनालय, विभागीय कार्यालय, पुणे यांनी या विभागाकडे सादर करु नये. तसेच त्यांचा सदरहू मुदतवाढीचा कालावधी समाप्त होण्यापूर्वी त्यांच्या जागी रिक्त होणाऱ्या पदावर अन्य कर्मचाऱ्याची नियुक्ती करण्याबाबत कार्यवाही करण्यात यावी व मुदतवाढीचा कालावधी समाप्त होताच त्यांच्या सेवा त्यांचे मूळ विभागाकडे प्रत्यावर्तीत करण्यात याव्यात.

६. श्रीमती सं.वि.पाटील, सहायक कक्ष अधिकारी या सामान्य प्रशासन विभागाच्या आस्थापनेवर कार्यरत आहेत. श्रीमती पाटील यांचा सामान्य प्रशासन विभाग (का-१९) हा प्रशासकीय विभाग असल्यामुळे त्यांच्या प्रशासकीय बाबी संबंधित कर्मचाऱ्यांचा प्रशासकीय विभाग व पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग/कार्यासन सां.का-४ यांचेमार्फत हाताळण्यात येतील.

७. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००२२५१५१६५४५५०७ असा आहे. सदरहू आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, serialNumber=54b11b1ccbdc577d71dce3b313c3fef5dc2ad659e360f73b682d6b6fccb8aecf, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2020.02.25 15:21:57 +05'30'

**(ग.भि.गुरव)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्रीमती सं.वि.पाटील, सहायक कक्ष अधिकारी, (संबंधित कार्यालयामार्फत).

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव (सेवा) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
२. प्रधान सचिव, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२
३. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई
४. विभागीय कार्यालय, सांस्कृतिक कार्य संचालनालय, पुणे
५. उप सचिव (आस्थापना/का.१९), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
६. सह/उप सचिव (कार्यासन सां.का.४), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२
७. साप्रवि/का.क्र.१४-अ (संग्रहार्थ/निवड नस्ती)